क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, गट-अ या पदावर पदोन्नतीबाबत...श्रीम.स्नेहल साळुंखे

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संक्रीआ १०२२/प्र.क्र.८७/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १८ ऑगस्ट, २०२३

**प्रस्तावना :-**

क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील जिल्हा क्रीडा अधिकारी/सहाय्यक संचालक संवर्गातून उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, गट अ या संवर्गात पदोन्नती देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील जिल्हा क्रीडा अधिकारी/सहाय्यक संचालक (वेतनश्रेणी - S-२० : ५६१००-१७७५००) या पदावर कार्यरत असणाऱ्या खालील नमूद अधिकाऱ्यास उप संचालक, क्रीडा व युवक सेवा (वेतनश्रेणी - S-२३ : ६७७००-२०८७००) या पदावर ज्येष्ठतेनुसार व गुणवत्तेनुसार खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ जातीचा प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्रीम.स्नेहल साळुंखे, (प्रसूती रजेवर) | खुला | उप संचालक, नाशिक या रिक्त जागी |

२. उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे या पदावर श्रीम.स्नेहल साळुंखे, जिल्हा क्रीडा अधिकारी यांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे:-

I. सदर शासन निर्णयाच्या दिनांकास पदोन्नतीसंदर्भात प्रलंबित सर्व न्यायालयीन याचिकांवर व मा.सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ वर होणाऱ्या निर्णयांस अधीन राहून सदर निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.
II. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट पिटिशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती या रिट याचिकेवर होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.
III. श्रीम.स्नेहल साळुंखे यांनी उप संचालक, क्रीडा व युवक सेवा पदावरील पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२/०९/२०१६ व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दिनांक ०१/०८/२०१९ मधील तरतुदीनुसार श्रीम.साळुंखे यांचे नाव सन २०२२-२३ च्या निवडसूचीतून काढून

टाकण्यात येईल आणि पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूचींमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत उप संचालक, क्रीडा व युवक सेवा पदावरील पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

IV. श्रीम.साळुंखे यांची उप संचालक, क्रीडा व युवक सेवा पदावरील पदोन्नती ही त्यांच्याविरूद्ध प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी खातरजमा करून श्रीम.साळुंखे यांच्याविरूद्ध विभागीय चौकशीची कार्यवाही सुरू वा प्रस्तावित असल्यास अवगत करावे.

३. श्रीम.साळुंखे यांनी पदोन्नती आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे व संबंधित अधिकारी रूजू झाल्याचा दिनांक आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी शासनास कळवावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०८१८१८०७५८२३२१ आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2023.08.18 18:10:44 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.राज्यपाल यांचे खाजगी सचिव,
(२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
(३) मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे खाजगी सचिव,
(४) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
(५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
(६) संबंधित अधिकारी (संचालनालयामार्फत),
(७) सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत),
(८) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत),
(९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
(१०) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
(११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
(१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
(१३) निवड नस्ती (क्रीयुसे-२).